**राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचा केंद्र हिश्याचा रु. ५७.६० लक्ष निधी वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८/प्र.क्र. १९३/३-अे,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

**दिनांक : १८ फेब्रुवारी, २०१९**

**वाचा:-**

१) केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय यांचे पत्र क्र. एफनं.३६-२८/२०१७- अेई, विस्तार कक्ष, दि.१५.६.२०१८ ची तीन पत्रे

२) संचालक आत्मा यांचे पत्र क्र.आत्मा/ प्र.क्र.१०१/अ.जमाती/पुरक मा./९४१/१८, दि. ११.१०.२०१८

३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.१४१/३-अे , दि. १७ सप्टेंबर, २०१८

४) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.११/कार्यासन ६,दि.११ फेब्रुवारी,२०१९

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ मध्ये राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) ही योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. १५.६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये पहिल्या हप्त्यापोटी केंद्र हिश्याचा (६० %) अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु. १८३.०७ लक्ष निधी वितरीत केला होता. तथापि, आदिवासी विकास विभागाने सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी केंद्र पुरस्कृत आत्मा योजनेसाठी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा (६०%) (२४०१ A५१२) या लेखाशिर्षाखाली रु. १२५.४७ लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित (Shadow provision) केली होती. त्याअनुषंगाने विभागाच्या संदर्भाधीन दि. १७.९.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर रु. १२५.४७ लक्ष निधी कृषि आयुक्त कार्यालयास वितरीत करण्यात आला आहे. केंद्र शासनाने आत्मा योजनेसाठी अनुसूचित जमाती (केंद्र हिस्सा ६०%) या प्रवर्गाखाली वितरीत केलेल्या रु. १८३.०७ लक्ष निधीपैकी उर्वरित निधी प्राप्त करून घेण्यासाठी रु. ५७.६० लक्ष निधी आवश्यक असल्याने सदर निधी महाराष्ट्र विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशन नोव्हेंबर, २०१८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करून देण्याची विनंती आदिवासी विभागामार्फ़त वित्त विभागास करण्यात आली होती. तदनुसार, महाराष्ट्र विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशन नोव्हेंबर, २०१८ मध्ये राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेंतर्गत केंद्र हिस्सा रु. ५७.६० लक्ष निधीच्या पुरवणी मागणीच्या प्रस्तावास विधानमंडळाची मान्यता प्राप्त झाली आहे. तदनुसार संदर्भाधीन दि.११ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभागाने आत्मा योजनेसाठी पहिल्या हप्त्यापोटी अनुसूचित जमाती या प्रवर्गाखाली प्राप्त झालेल्या निधीच्या अनुषंगाने रु. ५७.६० लक्ष इतका निधी विभागाच्या अर्थसंकल्पिय प्रणालीवर वितरीत केला आहे. सबब राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेसाठी केंद्र हिश्याचा रु. ५७.६० लक्ष निधी व त्यानुषंगाने समरुप राज्य हिश्याचा (DPDC मधून) रु. ३८.४० लक्ष गृहीत धरता सद्य:स्थितीत एकुण

रु. ९६.०० लक्ष निधी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी प्रवर्गासाठी चालू वर्षी वितरीत करणे शक्य आहे. त्यानुषंगाने, या शासन निर्णयान्वये सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :-**

१. सन २०१८-१९ मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषि विस्तार उप अभियानातंर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी चालू वर्षाकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्याचा रु. ५७.६० लक्ष (रुपये सत्तावन्न लक्ष साठ हजार फक्त) निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. त्या समरुप राज्य हिश्याचा निधी जिल्हा नियोजन व विकास समिती (DPDC) निधीतून उपलब्ध करुन घ्यावा. अशाप्रकारे या योजनेचा केंद्र व राज्य हिश्याचा (DPDC मधून) मिळून एकुण रु. ९६.०० लक्ष (रुपये शहाण्णव लक्ष फक्त) निधी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी चालू वर्षी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. योजनेकरीता प्रत्यक्ष वितरीत करण्यात येणा-या निधीच्या मर्यादेत योजनेची अंमलबजावणी करावी, तसेच सदर खर्च चालू वर्षी पुढे नमूद करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. टी-५,**
**२४०१ पीक संवर्धन,**
**७९६ अनुसूचित जमाती उपयोजना**
**(०१) अनुसूचित जमाती क्षेत्राखालील उपयोजनांतर्गत योजना**
**(०१) (१७)- कृषि उन्नती योजना - कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य - उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) (अनुसूचित जमाती) (२४०१ अे ५१२), ३३- अर्थसहाय्य**

३. आत्मा कार्यक्रम सन २०१८-१९ साठी अनुसूचित जमाती या प्रवर्गासाठी वितरीत करण्यात आलेला निधीचा केवळ त्याच प्रवर्गासाठी वापर करण्यात यावा.

४. सन २०१८-१९ मध्ये राज्यात सदर योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टिने, पुढील अधिकाऱ्यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित प्रकल्प संचालक आत्मा | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

५. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफ़एमएस प्रणालीव्दारे वितरीत करावा.

६. सदर योजनेंतर्गत सन २०१७-१८ मध्ये वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षीत केलेली उपयोगिता प्रमाणपत्रे (Audited Utilization Certificates) सत्वर सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.पूरक -२०१८/प्र.क्र.१३५/ अर्थ-३, दिनांक ५ डिंसेबर, २०१८ मधील अटींची पुर्तता करुन सदर परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१८१७२२२४९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeta Eknath Shinde

Digitally signed by Neeta Eknath Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f2bffd6992498e56663024368c72b33364cfb066d53682c53a425e54d187a7c1, serialNumber=f325d659f47933958aa2d98f394db95f94be57548776492ba36e77ea1c4aa53b, cn=Neeta Eknath Shinde
Date: 2019.02.18 17:24:28 +05'30'

(निता शिंदे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रती -**

१) मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.राज्य मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
3) सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) प्रधान सचिव (आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) आयुक्त (कृषि) तथा राज्य नोडल अधिकारी आत्मा, कृषि आयुक्तालय,पुणे
६) आयुक्त (आदिवासी विकास), नाशिक
७) संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय,पुणे
८) सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष आत्मा नियामक मंडळ ( मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून )
९) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
१०) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा उपाध्यक्ष आत्मा नियामक मंडळ
१२) संचालक वनामती, नागपूर
१३) उप संचालक, आत्मा, सामेती, पुणे
१४) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१५) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१६) सर्व प्रकल्प संचालक (आत्मा),
१७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८) कृषि विकास अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२०) महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
२१) वित्त विभाग (का.व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.३२
२२) नियोजन विभाग, कार्यासन - १४१४, १४३१, मंत्रालय, मुंबई.३२
२३) कार्यासन अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) निवड नस्ती (कार्यासन-३अे)